**वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८,**
**भाग-पहिला, उप विभाग-एक ते पाच पैकी**
**प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय**
**अधिकारांमध्ये सुधारणा करण्याबाबत**
------------------------------------------
**भाग-पहिला, उप विभाग-एक, अनुक्रमांक-११**
**भाग-पहिला, उप विभाग-दोन,**
**अनुक्रमांक- २८ अ,२९, ४१, १९ व १९-ब**
**भाग-पहिला, उप विभाग-तीन, अनुक्रमांक-३**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन शुध्दीपत्र क्रमांक : विअप्र-१०००/प्र.क्र.६३/२००१/विनियम.**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, **दिनांक :- २० नोव्हेंबर, २००१**

वाचा :- शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : विअप्र-१०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दिनांक ११.७.२००१.

## शासन शुध्दीपत्र

राज्य शासनाच्या प्रशासनिक विभागातर्गंत विभाग प्रमुख, क्षेत्रिय विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख यांना संदर्भाधीन शासन निर्णयान्वये वितीय अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत. सदर शासन निर्णयान्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांत पुढीलप्रमाणे वृद्धी व सुधारणा करण्यात येत आहे.

| **क्रमांक** | **वित्तीय अधिकार नियमपुस्तिका भाग-पहिला, उपविभाग व अनुक्रमांक** | **शक्तींचे वर्णन** | **सुधारणा** |
|---|---|---|---|
| **(१)** | **(२)** | **(३)** | **(४)** |
| १ | उप विभाग-एक अनुक्रमांक-११ नियम - १३४ | शासकीय अधिकारी / कर्मचारी यांना घर बांधणी अग्रिम मंजूर करणे. | स्तंभ-(६) खालील अटींच्या वर्णनातील अनुक्रमांक (३) च्या तिसऱ्या ओळीतील **"तरतिस्दश्चिह"** हा शब्द चुकीने छापण्यात आलेला असल्याने हया शब्दाऐवजी **"तरतूदींचे"** असा वाचण्यात यावा. |
| २ | उप विभाग-दोन अनुक्रमांक -१९ नियम - ६९ | शासकीय वाहनांच्या देखभाली-वरील, ती सुस्थितीत ठेवण्यासाठी आणि त्यांच्या दुरुस्तीसाठीच्या खर्चास मंजूरी देणे [ पेट्रोल, डिझेल, इंजिन ऑईल यांवरील खर्चाचा (या शक्तींच्या वर्णनात) अंतर्भाव राहणार नाही.] | स्तंभ (६) खालील अटींमधील अट क्रमांक (दोन) मधील तिसऱ्या ओळीतील मजकूरात पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.<br>(१) "सार्वजनिक बांधकाम विभागाच्या यांत्रिक विभागातील कार्यकारी अभियंता आणि कृषि" या शब्दांपुढे पुढील शब्दांचा समावेश करण्यात येत आहे.<br>**" व पदुम विभागातील प्रादेशिक दुग्धशाळा अभियंता"** (२) मजकूराच्या शेवटी पुढील वाक्य जोडण्यात येत आहे. **"सदर अधिकाऱ्यांनी त्यांच्या स्वत:च्या कार्यालयाप्रमाणे अन्य शासकीय कार्यालयाच्या गरजेप्रमाणे तपासणी अंती तातडीने असे प्रमाणपत्र द्यावे "** |

| | | | |
|---|---|---|---|
| ३ | उप विभाग-दोन, अनुक्रमांक - १९ ब, नियम - ६९ | सध्या असलेल्या मोटार वाहनांच्या बदली त्याच प्रकारची मोटार कार, जीप किंवा मोटार सायकल बदली म्हणून खरेदी करण्याच्या खर्चास मंजूरी देणे. | स्तंभ (३) खालील वित्तीय शक्तींच्या वर्णनातील चौथ्या ओळीतील **" म्हणून खरेदी करण्याच्या" व "खर्चास" या शब्दांच्या मध्ये "प्रवेश करासहित "** या शब्दांचा अंतर्भाव करण्यात येत आहे. |
| ४ | उप विभाग-दोन अनुक्रमांक - २८-अ नियम - ७६ | नवीन संगणक यंत्रणा खरेदी करणे आणि/सध्या उपलब्ध असलेल्या संगणक यंत्रणेत वाढ/त्याची श्रेणीवाढ करण्यास मंजूरी देणे, तसेच त्यासाठी आवश्यक असणारी वातानुकूलित यंत्रणेची मांडणी व देखभाल दुरुस्ती | स्तंभ (६) खालील अटींमधील **अट क्रमांक-२** मधील "प्रादेशिक संचालक, एन.आय.सी.पुणे किंवा त्यांचे अधिकृत प्रतिनिधी यांच्या सल्ल्याने करण्यात यावी " या शब्दांऐवजी **"यांच्या सल्ल्याने व त्यांनी वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार करावी "** असे वाचण्यात यावे.<br>**अट क्रमांक-४**मधील विक्रेत्यांची निवड एन.आय.सी च्या सल्ल्याने करण्यात यावी. असे करताना कमीतकमी किंमत लावणाऱ्या परंतु सर्व तांत्रिक गरजा पूर्ण करणाऱ्या पुरवठादारास प्राधान्य देण्यात यावे. ही वाक्ये वगळण्यात येत आहेत.<br>स्तंभ (६) खालील अटींमधील**अट क्रमांक ७** मधील "इन्टेलिजंट टर्मिनलसाठी या शब्दाऐवजी **"लॅन साठी उपयुक्त स्विचेस आणि रॉऊटर्स "** हे शब्द वाचण्यात यावेत. तसेच "परंतु डम्ब टर्मिनलसाठी वातानुकूलित यंत्रणा आवश्यक नाही " हे वाक्य **वगळण्यात** येत आहे. |
| ५ | उप विभाग-दोन अनुक्रमांक-२९ नियम - ७६. | शासकीय कार्यालयांमध्ये उपयोगात येत असलेल्या विविध यंत्राच्या दुरुस्तीवरील खर्चास मंजूरी देणे किंवा ती सुस्थितीत ठेवण्यासंबंधीचा /सेवा संविदेचा करार करणे, ती यंत्रे अशी :- | १) स्तंभ-(३) खालील **अनुक्रमांक १६** संगणक यंत्रणा या शब्दांपुढे **(आवश्यक तेथे वातानुकूलित यंत्रणेसह)** हे शब्द समाविष्ट करण्यात येत आहेत.<br>२) स्तंभ क्रमांक ६ मधील **अट क्रमांक (६)** च्या अखेरीस **" देखभाल दर करार कार्यपध्दती विषयक माहिती व तंत्रज्ञान संचालनालयाने वेळोवेळी काढलेल्या आदेशांचे अनुपालन करावे "** हे शब्द समाविष्ट करण्यात येत आहेत. |
| ६ | उप विभाग-दोन अनुक्रमांक-४१ नियम - १०४ | आस्थापनेवरील स्थायी शिपायांना ज्या प्रमाणात गणवेश मंजूर केला जातो. त्याच प्रमाणात स्थायी शिपायांना गणवेश मंजूर करणे. | स्तंभ-(३) खालील शक्तींच्या वर्णनातील तिसऱ्या ओळीतील "स्थायी" या शब्दाऐवजी **"अस्थायी"** अशी सुधारणा करण्यात येत आहे. |
| ७ | उपविभाग-तीन अनुक्रमांक-३ परिच्छेद क्रमांक-१६६ | अनुदानाचे फेरवाटप करण्यास मंजूरी देणे. | स्तंभ-(६) खालील अटींच्या वर्णनातील दुसऱ्या ओळीतील "१२" ही संख्या चुकीने छपाई झालेली असल्याने **रद्द करण्यात येत आहे.** |

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**अं ज.खानविलकर**
**कार्यासन अधिकारी, वित्त विभाग**

**प्रति**

* १. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र,मुंबई ४०० ०२०

* २. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०

* ३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
* ४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
५. राज्यपालांचे सचिव
६. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
७. उप मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव
८. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक
९. मंत्रालयातील सर्व प्रशासनिक विभागांचे अतिरिक्त मुख्य सचिव /प्रधान सचिव/ सचिव
१०. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे(पूर्व), मुंबई ४०० ०५१
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१३. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१४. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकणभवन, नवी मुंबई
* १५. प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
* १६. प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा), मुंबई
* १७. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, कुटीर क्र.३ व ४, अधिदान व लेखा कार्यालय आवार, मुंबई
* १८. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
* १९. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
* २०. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मादाम कामा रोड, मुंबई
* २१. प्रमुख न्यायाधीश, कुटुंब न्यायालय, नागपूर/मुंबई, वांद्रे, मुंबई ४०० ०५१
२२. उप संचालक, लेखा व कोषागारे, कोकण विभाग,कोकण भवन, नवी मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/ नाशिक/अमरावती
२३. उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा,कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई/ पुणे/ नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती
२४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२५. सर्व उप कोषागार अधिकारी
२६. मंत्रालयाच्या सर्व प्रशासनिक विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख आणि कार्यालय प्रमुख
२७. सहकार व वस्त्रोद्योग विभाग( कार्यासन -हाऊसिंग सेल ,१९ -सी ),मंत्रालय, मुंबई:३२
२८. सर्व विभागीय आयुक्त
२९. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३०. सर्व जिल्हाधिकारी
३१. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
३२. सर्व जिल्हा परिषदांचे अर्थ विभागातील मुख्य लेखा व वित्त अधिकारी
३३. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली ११० ००१
३४. संचालक (माहिती), महाराष्ट्र परिचय केंद्र, अ-८, स्टेट एम्पोरिया इमारत, बाबा खरकसिंग मार्ग, नवी दिल्ली ११०००१
३५. वित्त विभागातील सर्व कार्यासने
३६. निवड नस्ती, विनियम, वित्त विभाग
* पत्राद्वारे.